वितरण आदेश क्र.४
रोख स्वरुपात देय

**अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१०-२०११**
**राष्ट्रीय बायोगॅस व खत व्यवस्थापन कार्यक्रम.**
**मागणी क्र. एल-३, २८१०, अपारंपरिक ऊर्जा साधने ०१- बायो-एनर्जी १०१, बायोगॅसच्या विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम (०१) पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजनेतील केंद्र पुरस्कृत योजना-(०१) (०१) गोबरगॅस संयंत्र बसविणे (२८१० ००१६) ५३ मोठी बांधकामे**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्र. बिजीएस-२०१०/प्र.क्र.९५-भाग-३ /यो-६
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २० जानेवारी, २०११

पहावे : १) ग्रा.वि.व ज.सं. वि. शासन पत्र क्र. बिजीटी -२०१०/सीआर ४९/वित्त-१, दिनांक १९ एप्रिल, २०१०
२) ग्रा.वि.व ज.सं. वि. शासन निर्णय क्र. बिजीएस-२०१०/प्र.क्र. ९५/यो-६, दिनांक: २३ एप्रिल, २०१०
३) ग्रा.वि.व ज.सं. वि. शासन निर्णय क्र. बिजीएस-२०१०/प्र.क्र. ९५/यो-६, दिनांक: २६ मे.२०१०
४) ग्रा.वि.व ज.सं. वि. शासन निर्णय क्र. बिजीएस-२०१०/प्र.क्र. ९५/यो-६, दिनांक: २० ऑक्टो.२०१०
५) ग्रा.वि.वज.सं.वि.शासन शुध्दिपत्रक क्र.बिजीएस-२०१०/प्र.क्र.९५भाग-३/यो-६,दिनांक: २२ ऑक्टो.२०१०

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय बायोगॅस व खत व्यवस्थापन कार्यक्रम योजना ही १००% केंद्र पुरस्कृत योजना असून, सदर योजना केंद्र शासनाच्या २० कलमी कार्यक्रमाअंतर्गत समाविष्ट आहे. केंद्र शासनाच्या नवी आणि नवीकरणीय उर्जा मंत्रालयाकडून दरवर्षी महाराष्ट्र राज्यासाठी बायोगॅस संयंत्राचे उद्दिष्ट प्राप्त होते. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेले उद्दिष्ट शासनस्तरावरुन सर्व जिल्हा परिषदांना ठरवून देण्यात येते. राज्यास प्राप्त झालेल्या उद्दिष्टाच्या अनुषांगाने राज्याच्या अर्थसंकल्पात प्रथमत: शॅडो तरतूद करण्यात येते. व जिल्हा परिषदांना ठरवून दिलेल्या उद्दिष्टाच्या अनुषंगाने सदरचा निधी अर्थसंकल्पीय प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येतो. प्रतिवर्षी साध्य झालेल्या बायोगॅस संयंत्राच्या उद्दिष्टानुसार केंद्र शासनास खर्चाचे क्लेम्स् सादर केल्यानंतर राज्याने केलेल्या खर्चानुसार केंद्र शासनाकडून २ किंवा ३ हप्त्यात निधी मंजूर होवून तो राज्य शासनास प्राप्त होतो. या मंजूर केलेल्या अनुदानातून राज्य शासनाने केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यात येते.

**शासन निर्णय :**

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षातील राष्ट्रीय बायोगॅस व खत व्यवस्थापन कार्यक्रमाचा

खर्च भागविण्यासाठी मागणी क्र. एल-३, २८१०, अपारंपरिक ऊर्जा साधने ०१- बायो-एनर्जी १०१. बायोगॅसच्या विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम (०१) पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजनेतील केंद्र पुरस्कृत योजना- (०१) (०१) गोबरगॅस संयंत्र बसविणे (२८१० ००१६) ५३ मोठी बांधकामे या मुख्य लेखाशिर्षाखाली **रु.१३,०४,५०,०००/- (रुपये तेरा कोटी चार लक्ष पन्नास हजार फक्त)** एवढी तरतुद राज्याच्या अर्थसंकल्पात करण्यात आलेली आहे.

२. सन २०१०-२०११ चा अर्थसंकल्प दिनांक २५ मार्च, २०१० रोजी विधानमंडळास सादर होऊन त्यावर मागणीनिहाय चर्चा होऊन पहिल्या २ महिन्यांचा (एप्रिल ते मे, २०१० पर्यंतचा ) खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २०१० मंजूर केले होते. सदर विधेयकाचे अधिनियमात रुपांतर झाले असून ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-४ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक ३१ मार्च, २०१० मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

३. त्यानुषंगाने सन २०१०-२०११ या चालू आर्थिक वर्षात राष्ट्रीय बायोगॅस व खतव्यवस्थापन कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी संदर्भिय क्र.२,३ व ४ येथील शासन निर्णयान्वये सन २०१०-२०११ करीता एकुण **रु. ५,८५,८८,६२४/- (रुपये पाच कोटी पंच्याऐंशी लक्ष अठ्ठयाऐंशी हजार सहाशे चोवीस फक्त)** एवढे अनुदान तर सन २००९-२०१० या वर्षातील प्रलंबित राहीलेले **रु. २,६२,०४,३७६/- (रुपये दोन कोटी बासष्ट लक्ष चार हजार तीनशे शहात्तर फक्त)** असे एकूण **रु. ८,४७,९३,०००/- (रुपये आठ कोटी सत्तेचाळीस लक्ष त्र्याण्णव हजार फक्त)** एवढे अनुदान संबंधीत जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या ट्रेझरी कोड क्रमांकावर अर्थसंकल्पीय प्रणालीमार्फत (BDS System) वितरित करण्यात आले आहे.

४. सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षाच्या सुरवातीस प्रथमत: केंद्र शासनाकडून राज्यासाठी ८००० बायोगॅस संयंत्राचे उद्दिष्ट प्राप्त झाले आहे. राज्यात **पर्यावरण संतुलित ग्राम समृध्द् योजना** राबविण्यास सुरुवात झाली असल्याने या योजनेंतर्गत बायोगॅस कार्यक्रमाला महत्व दिले असून चालु वर्षात राज्यात बायोगॅस कार्यक्रम अधिक प्रमाणात राबवावयाचा असल्याने केंद्र शासनाकडून ऑक्टोबर,२०१० मध्ये प्राप्त झालेले १२००० बायोगॅस संयंत्राचे अधिकचे उद्दिष्ट सर्व जिल्हा परिषदांना शासन आदेश क्रमांक-बिजीएस-२०१०/प्र.क्र.९८/योजना-६९, दिनांक २१ ऑक्टो,२०१० अन्वये वाटप

करण्यात आले आहे. त्यामुळे चालु वर्षात राज्यासाठी एकूण **२०००० बायोगॅस** संयंत्राचे उद्दिष्ट प्राप्त असून सदरचे उद्दिष्ट मार्च,२०११ पर्यंत १००% पूर्ण करावयाचे आहे.

५. त्यानुषंगाने बायोगॅस कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना क्रमांक ६ मध्ये दर्शविल्यानुसार **रु.४,५६,५७,०००/-(रुपये चार कोटी छप्पन्न लक्ष सत्तावन्न हजार फक्त)** एवढे अनुदान सन २०१०-२०११ या वर्षाकरीता या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीय प्रणालीद्वारे (BDS System) वितरीत करण्यात येत आहे.

६. या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या विवरणपत्रातील रकाना ६ मध्ये दर्शविलेल्या रकमेपेक्षा अधिक खर्च या कालावधीत होणार नाही, याची दक्षता संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच आतापर्यंत वितरित केलेल्या एकूण अनुदानापैकी प्रत्यक्ष केलेल्या खर्चाचा मासिक प्रगती अहवाल संबंधीत जिल्हा परिषदांनी दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास सादर करण्यात यावा.

७. केंद्र शासनाच्या नवी आणि नवीकरणीय उर्जा मंत्रालयाकडून मागण्या (क्लेम्स्) पूर्णत: अदा केल्या जातील असे गृहीत धरुनच राज्य शासन जिल्हा परिषदांना उद्दिष्टांच्या अनुषंगाने अनुदान मंजूर करते या मागण्यांच्या बाबतीत केंद्र शासनाने नाकारलेली रक्कम यानंतर देण्यात येणा-या अनुदानातुन वळती करुन देण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

८. सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात बायोगॅस कार्यक्रमांतर्गत राज्यात उभारणी करण्यात येणा-या बायोगॅस संयंत्रावर होणारा खर्च हा मागणी क्र. एल-३, २८१०, अपारंपारिक ऊर्जा साधने ०१- बायो-एनर्जी १०१, बायोगॅसच्या विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम (०१) पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजनेतील केंद्र पुरस्कृत योजना- (०१) (०१) गोबरगॅस संयंत्र बसविणे (२८१० ००१६) ५३ मोठी बांधकामे या मुख्य लेखाशीर्षाखाली सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

९. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान हे कोषागारातील **रोख रकमेव्दारा देय आहे.** हे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर केलेले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. सदर योजना १००% केंद्र पुरस्कृत असून २० कलमी कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचा घटक असल्याने मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सदर आदेशानुसार या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी तातडीने अनुदान उपलब्ध करुन दयावे.

१०. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३६/११/अर्थ-१७, दिनांक १७.१.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०१२०१९०७४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(उज्वला अ.रणसिंग)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
१) विभागीय आयुक्त (सर्व)
२) महालेखापाल महाराष्ट्र-१ मुंबई ( लेखा परिक्षा )( लेखा व अनुज्ञेयता ) (जादा ५ प्रतीसह)
३) महालेखापाल महाराष्ट्र-२ नागपूर ( लेखा परिक्षा ) ( लेखा व अनुज्ञेयता ) (जादा ५ प्रतीसह)
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व)
६) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
७) कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व)
८) उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व)
९) जिल्हा लेखा परिक्षक जिल्हा परिषद ( सर्व)
१०) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र, मुंबई
११) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२) नियोजन विभाग (१४४३/१४४४), मंत्रालय, मुंबई
१३) वित्त विभाग (व्यय- ५ /अर्थ- १६), मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-२, वित्त-६, वित्त-७,वित्त-८, योजना-२,योजना-३, योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती, कार्यासन योजना-६, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

क्रमांक: बिजीएस-२०१०/प्र.क्र.९५/भाग-३/योजना-६ वितरण आदेश क्र.४

विवरणपत्र

सन २०१०-२०११ या वर्षात मागणी क्र.३,२८१०,अपारंपारिक उर्जा साधने ०१-बायो-एनर्जी १०१.बायोगॅसच्या विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजनेतील केंद्र पुरस्कृत योजना (०१) (०१) गोबरगॅस संयंत्र बसविणे (२८१० ००१६) ५३ मोठी बांधकामे.

| अ.क्र. | जि.प. | जि.प.ना वाटप केलेले उद्दिष्ट | सन २००९-१० साठी २०/१०/२०१० च्या आदेशान्वये वितरित केलेले अनुदान | सन २०१०-११ साठी ऑक्टोबर २०१० पर्यंत वितरित केलेले एकूण अनुदान | सन २०१०-११ साठी जानेवारी २०१० मध्ये वितरीत करावयाचे अनुदान | रकाना ४,५ प्रमाणे मुक्त केलेले व रकाना ६ नुसार वितरित करावयाचे एकुण अनुदान (४+५+६) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | ठाणे | ३५० | ११७४०० | ८५५४९४ | ५००००० | १४७२८९४ |
| २ | रायगड | ३५० | ३९९०२३ | ९२५००० | ८००००० | २१२४०२३ |
| ३ | रत्नागिरी | ४०० | ३५०९२३ | ९२५००० | ८००००० | २०७५९२३ |
| ४ | सिंधुदुर्ग | ११०० | ४९२३२३ | १९७२००० | १०००००० | ३४६४३२३ |
| कोकण विभाग | | २२०० | १३५९६६९ | ४६७७४९४ | ३१००००० | ९१३७१६३ |
| ५ | नाशिक | ४०० | ७२५४०३ | ९२५००० | १२००००० | २८५०४०३ |
| ६ | धुळे | १४० | १७४३८३ | ६१०००० | ६००००० | १३८४३८३ |
| ७ | नंदुरबार | ३०० | ५५५६२३ | ९२५००० | १०००००० | २४८०६२३ |
| ८ | जळगांव | ४०० | १३३२२३ | ९२५००० | ७००००० | १७५८२२३ |
| ९ | अहमदनगर | १२५० | ८०९७२३ | २७६०००० | १३००००० | ४८६९७२३ |
| नाशिक विभाग | | २४९० | २३९८३५५ | ६१४५००० | ४८००००० | १३३४३३५५ |
| १० | पुणे | ८०० | १२४७९५५ | ४५००००० | १५००००० | ७२४७९५५ |
| ११ | सातारा | १२०० | १३०९५८३ | २४००००० | १८००००० | ५५०९५८३ |
| १२ | सांगली | २०७५ | ४८०२८२३ | ५५५०००० | ५१००००० | १५४५२८२३ |
| १३ | सोलापुर | १२०० | ८८१२३ | ३१००००० | १२००००० | ४३८८१२३ |
| १४ | कोल्हापुर | ५००० | ४७७३०६३ | १६५२३१३० | १०७५७००० | ३२०५३१९३ |
| पुणे विभाग | | १०२७५ | १२२२१५४७ | ३२०७३१३० | २०३५७००० | ६४६५१६७७ |
| १५ | औरंगाबाद | ५५० | ५१४९२३ | ७२५००० | १०००००० | २२३९९२३ |
| १६ | जालना | ३०० | ९५९१२३ | ७२५००० | १३००००० | २९८४१२३ |
| १७ | परभणी | २५० | ७५०७२३ | ७२५००० | १२००००० | २६७५७२३ |
| १८ | हिंगोली | ३०० | ८२३३४३ | १६५०००० | ८००००० | ३२७३३४३ |
| १९ | बीड | २५० | ३४८५२३ | ८००००० | ८००००० | १९४८५२३ |
| २० | नांदेड | ३५० | २९७९०३ | १६००००० | ८००००० | २६९७९०३ |
| २१ | उस्मानाबाद | ३०० | ३६२३२३ | ७२५००० | ८००००० | १८८७३२३ |
| २२ | लातुर | ३५० | ७२२६२३ | ७२५००० | १२००००० | २६४७६२३ |
| औरंगाबाद विभाग | | २६५० | ४७७९४८४ | ७६७५००० | ७९००००० | २०३५४४८४ |

क्रमांक: बिजीएस-२०१०/प्र.क्र.९५/भाग-३/योजना-६ वितरण आदेश क्र.४

विवरणपत्र

सन २०१०-२०११ या वर्षात मागणी क्र.३,२८१०,अपारंपारिक उर्जा साधने ०१-बायो-एनर्जी १०१,बायोगॅसच्या विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजनेतील केंद्र पुरस्कृत योजना (०१) (०१) गोबरगॅस संयंत्र बसविणे (२८१० ००१६) ५३ मोठी बांधकामे.

| अ.क्र. | जि.प. | जि.प.ना वाटप केलेले उद्दिष्ट | सन २००९-१० साठी २०/१०/२०१० च्या आदेशान्वये वितरित केलेले अनुदान | सन २०१०-११ साठी ऑक्टोबर २०१० पर्यंत वितरित केलेले एकूण अनुदान | सन २०१०-११ साठी जानेवारी २०१० मध्ये वितरीत करावयाचे अनुदान | रकाना ४,५ प्रमाणे मुक्त केलेले व रकाना ६ नुसार वितरित करावयाचे एकुण अनुदान (४+५+६) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| २३ | बुलढाणा | ३०० | ७१७७०३ | ९२५००० | १२००००० | २८४२७०३ |
| २४ | अकोला | १५० | १८७९२३ | ६००००० | ६००००० | १३८७९२३ |
| २५ | वाशिम | ३५ | २६२३५१ | ७०१००० | ० | ९६३३५१ |
| २६ | अमरावती | ३०० | ५९२६२३ | ७२४००० | १२००००० | २५१६६२३ |
| २७ | यवतमाळ | २५० | ४७३४२३ | ७२४००० | १०००००० | २१९७४२३ |
| अमरावती विभाग | | १०३५ | २२३४०२३ | ३६७४००० | ४०००००० | ९९०८०२३ |
| २८ | वर्धा | २०० | ४२८२२३ | ७२४००० | ८००००० | १९५२२२३ |
| २९ | नागपुर | २०० | ४४८३२३ | ७२४००० | ८००००० | १९७२३२३ |
| ३० | भंडारा | ३०० | ७४९७८३ | ७२४००० | १२००००० | २६७३७८३ |
| ३१ | गोंदिया | २०० | ४३२८२३ | ७२४००० | ८००००० | १९५६८२३ |
| ३२ | चंद्रपूर | २५० | ६९१९२३ | ७२४००० | ११००००० | २५१५९२३ |
| ३३ | गडचिरोली | २०० | ४६०२२३ | ७२४००० | ८००००० | १९८४२२३ |
| नागपूर विभाग | | १३५० | ३२११२९८ | ४३४४००० | ५५००००० | १३०५५२९८ |
| एकूण | | २०००० | २६२०४३७६ | ५८५८८६२४ | ४५६५७००० | १३०४५०००८ |

(उज्वला अ.रणसिंग)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.